मत्सरासुर शामक श्री वक्रतुंड विनायक!

श्रीमन मुदगल महापुराणाने आठ खंडात ज्या अष्टविनायकांची चरित्रे रेखाटली त्यापैकी प्रथम चरित्र आहे भगवान श्री वक्रतुंड विनायकाचे. मत्सरासुर नामक राक्षसाच्या विनाश लीलांना शमविण्यासाठी हा अवतार होत असतो.

या अवताराची कथा आरंभी पाहू म्हणजे मग ह्या कथाभागाच्या गुढार्थाचे विवरण सुलभ होईल. देवराज इंद्राच्या नगरीत त्यांच्या स्वर्गारोहीन दिनाचा उत्सव सुरु होता. आधीच इंद्रनगरी त्यात ती उत्सवासाठी सजली. मग आपण मानवी शब्दात त्या सौंदर्याबाबत काय बोलू शकणार? सगळ्या देवी, देवता. ईश्वर, महेश्वर आपापल्या परिवारासह विराजमान झाले होते.

'काव्यशास्त्र विनादैने कालो गच्छति धीमत्ताम' अर्थात बुद्धीमंताचा काळ हा काव्य, शास्त्रचर्चा, विनोद यांनी युक्त असतो या न्यायाने समस्त सभा आनंदमग्न होती. वसंतऋतुसह श्रीकामदेवांच्या उपस्थितीने सभेची उन्मादकता कितीतरी पट वृद्धिंगत झाली होती आणि तेवढयात ती आली. आधीच ती अनुपमेय सौंदर्याची खाण.

त्यात या उत्सवासाठी विशेषत्वाने नटली परिणामी वैराग्यशिरोमणी श्रीशंकरांनाही विचलीत करेल अशा त्या सौंदर्यासह 'रंभा' इंद्रनगरीत अवतरली. त्या सौंदर्यबाणाने आपले ध्येय ठरविले देवराज इंद्राला. तिच्या नयनकटाक्षांनी देवराज कामातुर झाले. पण सभेत त्रिदेव उपस्थित आहेत म्हटल्यावर त्यांनी कसेबसे आत्मनियंत्रण केले. मात्र कामवेगाचा परिणाम म्हणून सभा लवकर आटोपती घेत सगळ्यांना निरोप देऊन देवराज रंभेसह प्रमदवनाची वाट जवळ करते झाले.

रंभेसह दिव्य स्वर्गीय विलास करीत इंद्रदेव रमले होते. पण नियतीच्या मनात वेगळाच खेळ होता. दैववशात अचानक तेथे महर्षी दुर्वासांचे आगमन झाले. आता दुर्वास म्हणजे मूर्तिमंत क्रोध ही प्रतिमा ज्ञात असणा-या देवराजांनी क्षणात रंभेला तर दूर केले पण मनातील तिची आसक्ती अशी दूर होणार? त्या कामवेगाचा परिणाम म्हणून देवराज स्खलित झाले.

त्यांना स्वत:चीच लज्जा वाटली. महर्षीसमोर देवराज असताना माझे असे पतन व्हावे याचे वैषम्य वाटले पण आता नियतीचे दान तर पडले होते. देववीर्य पृथ्वीवर पडले आणि त्यापासून पृथ्वीतून एक बालक जन्माला आले. ज्याच्या उत्पत्तीचे कारणच विकारवशता होते ते बालक सदगुनी होणारच कसे? ते राक्षसत्वालाच प्राप्त झाले. त्याला इतिहासाने 'मत्सरासुर' नावाने आपल्यात स्थान दिले.

जगन्माता असणारी पृथ्वीच त्याची माता होती. तिने त्याचे उत्तरदायित्व दैत्यगुरु शुक्राचार्यांकडे दिले. त्याचे उपनयन झाले. श्रीगुरू व मंत्र मिळाला आणि मत्सरासुर तपाचरणात लीन झाला.

# संकष्ट चतुर्थी

श्री वक्रतुंडाय नम:!

भगवान श्री वक्रतुंडांनी केलेल्या मत्सरासुर निग्रहणाचा कथाभाग आपण मागील चतुर्थीस कथा रुपात पाहिला आता कथनीयाचा विचार करू.

श्रीमद मुदगल पुराणाने आपल्याच आत विद्यमान अष्ट विकारांना राक्षस रुपात वर्णिले. षड रिपु रुपात सर्वत्र वर्णीत काम, क्रोध, लोभ, मोह, मद, मत्सर आणि ममत्व व अहंकार असे हे आठ असुर.

मात्र येथील गंमत पहा काम, क्रोध, असा त्यांचा क्रम नाही. क्रम नेमका उलटा आहे. मत्सर, मद, मोह करीत कामापर्यंत आणि शेवटी मम व अहंकार असा क्रम कां? तर हा विलयाचा क्रम आहे. तो उलटच असणार आहे.

कोणत्याही प्रवासात पहा एक गोष्ट आपणास सहज कळेल की एका गावाहून आपण दुस-या गावाला निघालो तर मार्गात जी गावे ज्या क्रमाने येतात ती लिहून ठेवा. परतत असतांना तो क्रम नेमका उलटा असणार आहे येथेही हीच रचना आहे.

श्रीगणराज प्रभुंपासून आरंभ पावत आपल्या या देहापर्यंतच्या निर्मितीचा हा भासमान का होईना 'सर्ग' प्रवास झाला. आता 'प्रतिसर्ग' पाहायचा आहे. भगवंतापर्यंत 'परत' जायचे आहे. या परतीच्या प्रवासातील पहिला टप्पा आहे 'मत्सरासुर'.

त्याला शरण आणले तरच पुढचा टप्पा असे करत करत आठ टप्पे. सगळे पार झाले तर आणि तरच 'श्रीस्वानंदनाथ'.

साधकीय अंतर्यात्रेचा पहिला अडथळा आहे मत्सरासुर. अत: प्रथम खंडात त्यालाच असुर संबोधिले आहे.

येथे साधकीय जीवनात घडणारी एक महत्वाची प्रक्रिया खूप शांतपणे समजून घ्यावी लागते.

विविध साधनामार्गांचा, पंथोपंथाचा अंगीकार करून अनेक जण साधनारत होतात. मात्र त्याच वेळी एक विचित्र द्वंद्व सुरु होते. एक मन साधनारत असते तर दुसरे विषयासक्त.

आता आपण साधनेत लागलो म्हणजे आपल्या मनात असे विकार यायलाच नकोत अशा विचित्र धारणेने साधक ग्रस्त होतो. समाज त्याच्या या धारणेला पुष्ट करतो. काहो! गुरु केले नां तुम्ही? तरी असेच कां? हेच कां तुमच्या चतुर्थीचे फल? हीच का मोरयाची उपासना? फायदा काय तुमच्या पारायणाचा? इकडे आध्यात्मिक म्हणवता आणि तिकडे रागावता हे कसे? अशा अगणित प्रश्नांनी साधकाचा गोंधळ अधिकच वृद्धिंगत होत जातो.

या सगळ्या समस्यांचे परमसुंदर समाधान आहे श्रीमुदगल पुराण..

प्रथम हे ध्यानात घ्यायला हवे की एखाद्याने मोरयाची उपासना 'सुरु केली' याचा अर्थ ती फक्त सुरु झाली आहे. संपली थोडीच आहे? हे बदल उपासनेच्या समाप्तीची फळ आहेत. आरंभात ती कशी मिळतील. विद्यापीठात प्रवेश घेणे आणि पदवी मिळणे यात काही अंतर आहे की नाही? पण हे न समजून घेता साधक गोंधळतो आणि इतर त्याच्या गोंधळास वाढवतात.

उपासनेने हे विकार शमतात हे वास्तव आहे. पण उपासना सुरु करताच ते कसे जातील? २५ वर्षांची जखम असेल तर भरण्यासाठी किमान २५ दिवस तरी द्याल की नाही., उलट जखम होते क्षणात आणि अनेकदा पुरते आयुष्यभर. मग

जर बाल 'जखम' अशी तत्काळ भरत नसेल तर अंतरीचे विकार असे एका सत्यविनायकात कसे मरतील? हा साधा विचारही आपण करत नाही.

अत: श्रीमुदगल पुराणाचे प्रथम कथन आहे की विकार उत्पन्न होतात कां? होऊ द्यात. त्यात अनैसर्गिक असे काहीही नाही. तुमच्या माझ्या सारख्या साधकांच्या मनात ते आले तर काय आश्चर्य देवताही त्यांपासून सुटल्या नाहीत. ऋषीही मुक्त नाहीत.

याच साठी प्रथम असुर मत्सरासुराची निर्मिती वर्णिली आहे देवराज इंद्रापासून साधकाला पहिल्याच टप्प्यावर एक दिलासा दिला आहे की इंद्रालाही मत्सर सुटला नाही. मग तुला तो कसा सोडेल? त्यामुळे तो 'आला' म्हणून वाईट वाटून घेऊ नको, रडू नको, थकु नको.

'आला' यात काही अनैसर्गिक नाही हा 'गेलाच नाही' तर मग घातक आहे. इंद्राने मत्सरासुराचा सांभाळ केलेला नाही त्याने त्याचा 'त्याग' केला त्याग आहे विनाश नाही संपवता येत नाही. इंद्रासच काय विष्णू, शंकरांनाही तो संपवणे शक्य नाही. पण त्याग तर संभव आहे नां? आत्मीयता तर नको नां?

मत्सरासुर प्रगटला आणि इंद्रास स्वत:ची लाज वाटली. असे कथा सांगते. आपल्या विकारवश होण्याची अशी अंतरी लाज वाटणे हाच त्यागाचा आरंभ आहे. आपल्याला अशी लाजच वाटत  नाही उलट अनेकदा आपण त्या विकारांनाच कवटाळून  बसतो. उदा. माझा राग मोठा बेकार आहे बर कां? असे अभिमानाने सांगणारा भेटतो तेव्हा वाटते की याच्या उन्नतीचे दार पक्के बंदच आहे.

श्रीमुदगल पुराण सांगते विकार येतात तर येऊ द्या. ते स्वाभाविक आहे. पण किमान त्यांची जोपासना तर करू नका. कुरवाळत तर बसू नका ते 'आपले' नाहीत असे वाटतील तेव्हाच त्यांच्या निराकरणाचा मार्ग प्रशस्त होऊ शकतो. कारण एकदा 'आपले' म्हटले की मग त्याला धक्काही लागू नये या साठीच आपण प्रयत्न करतो.

अत: प्रथम कार्य आहे इंद्राद्वारे केलेला त्याग. जोपासण्याची वृत्ती सोडणे. अर्थात असा आपले पणा सोडला तरी तो मरत नाही. उलट तो अन्यत्र वाढतोच. त्याचा विस्तार होतोच हे सांगतांना पुराण कारांनी त्याचे तप, त्याचा संसार त्याचा वंशविस्तार वर्णिला आहे. किती सुंदर रूपक आहे हे मत्सरासुराचे पुत्र कोण? तर सुंदरप्रीय आणि विषयप्रिय.

मत्सराचा पसारा कशाने वाढतो? तर सुंदरप्रीयतेमुळे आणि विषयप्रीयतेमुळे. मत्सर नाही मारला जात पण ही मुले मारली जातात. अर्थात जीवनातून सुंदरप्रियता आणि विषयप्रीयता कमी करता येते. या बाबी कमी झाल्या की मत्सर दुबळा होतो.

गंमत पहा पहिल्याच खंडात मत्सरासुर कां? तर या सगळ्या अष्टविकारात सगळयात दुर्बल आहे. सगळयात खाली आहे. म्हणूनच उन्नतीच्या मार्गावर 'खालून पहिला' असल्याने पहिल्या खंडात आला आहे.

मत्सर दुबळा आहे कारण तो दुबळ्याचाच साठी आहे. मत्सर कधीही समर्थास होतच नाही. मत्सर नेहमी आपल्यापेक्षा वरच्याचाच वाटतो. पायी जाणा-यास सायकल वाल्याचा, त्याला गाडी वाल्याचा आणि त्याला विमानातून जाणा-याचा मत्सर वाटू शकतो. विमानातून जाणा-याला पायी चालणा-याचा हेवा, मत्सर, इर्षा वाटली असे कधी होईल कां? उलट तो प्रथम फेरीकरीताही विमानतळावर जात असतांनाही बसच्या रांगेत उभ्या असणा-याकडे तुच्छतेने पाहतो.

अर्थात मत्सर हा नेहमी वरच्याचाच येतो तसे उन्नत होण्याची इच्छा तर आहे पण क्षमता तर नाही अशा विचित्र दशेची परिणती असते मत्सर.

मग मत्सर त्यागाचा उपाय काय? तर एक तर स्वत: सर्वोच्च होणे अथवा सर्वोच्चाचा संग करणे. मोठया पदाशी जुळले तरी मत्सर कमी होतो. उदा. पंतप्रधानाच्या सचिवास कधी ग्रामपंचायत सचिवाचा मत्सर वाटेल कां? तर नाही.

त्याच स्वरुपात एकदा मी सर्वपूज्य सर्वादिपुज्य मोरयाचा भक्त आहे ही भावना दृढ झाली की सामान्य मत्सर हळूहळू गळून पडतात. व्यावहारिक श्रमिक सुखाच्या मागे लागलेल्या सुंदरप्रीय, विषयप्रिय जणांचा मत्सर वक्रतुंड प्रियास वाटणे असंभव आहे. फक्त त्यासाठी वक्रतुंड प्रीयता परमदृढ असायला हवी.

मत्सराचे कारणच आहे विविधता. माझ्या जवळ जे नाही त्याची मनीषाच मला मत्सरग्रस्त बनवत असते. हे नसले पण जी मनात भरवते तिला माया म्हणतात. माया शब्दाची फोडच आहे मा म्हणजे नाही आणि या म्हणजे जी. ' जी नाही' ती माया. जी नाही त्याचाच विचार करायला लावते तिलाच माया म्हणतात.

माझ्या जवळ नसलेल्या विमानाचा विचार करीत मी मत्सरग्रस्त होतो त्यावेळी माझ्याजवळ असलेल्या गाडीचाही मी आनंद घेऊ शकत नाही. 'नाही' त्याचा विचार करीत 'आहे' त्याचाही आनंद घेऊ देत नाही तीच माया. तीच मत्सराला कारणीभूत असते. मग तिच्या निरासाचा मार्ग काय तर 'वक्रतुंड'.

कशाला म्हणतात 'वक्रतुंड' मराठीचा अर्थ येथे लागत नाही. काही जण वेगळाच अर्थ काढतात सोंड वाकडी म्हणून वक्रतुंड. पण हे लागू पडत नाही कारण सोंड हे तोंड नाही नासिका असते आणि शब्द वक्रतुंड आहे. वक्रनासिका नाही. मग काय आहे वक्रतुंड?

शास्त्र सांगते 'वक्रा' म्हणजे माया. त्या मायेला जो तोंडाने नुसत्या फुंकरीने उडवून लावतो तो परमात्मा, ते परब्रह्म म्हणजे वक्रतुंड. 'नाही' त्याच्या मागे लागण्याची वृत्ती उडवतात ते वक्रतुंड. त्याचा परिणामरूप मत्सर शरण येण्यास बाध्य होतो अशी ज्यांची लीला ते मत्सरासुर निग्रहक श्रीवक्रतुंड.

अर्थात इंद्रासही सुटला नाही म्हणून आपला प्रकटला तर व्यथित न होता सुंदरप्रीयता आणि विषयप्रीयता नष्ट करीत नाही त्याच्यामागे लागण्यापेक्षा 'आहे' त्याचा आनंद घेत मत्सरासुरास श्री वक्रतुंड शरण आणण्याचा साधकीय प्रयास म्हणजे श्री मुदगल पुराणाचा प्रथम खंड.

जय वक्रतुंड! जय गणेश!

संदर्भ ग्रंथ :- श्री मुदगल पुराण

आपले नम्र:- श्रीमंत दगडूशेठ हलवाई सार्व. गणपती ट्रस्ट, पुणे

अधिक माहिती करता संपर्क

ईमेल: sgpund@rediffmail.com

भगवान श्री एकदंत मदासुर विनाशक अवतार!

महर्षी भृगुंचे चिरंजीव महर्षी च्यवन. श्रीच्यवनांच्या तपाचरणात राजा शर्याती कन्या सुकन्येने विघ्न आणले. शिक्षा रुपात च्यवनांनी तिच्यासोबत लग्न लावून देण्याची अट घातली. अन्यथा सगळ्या राज्याचा विनाश होणार हा विचार करीत राजकन्या ऋषीपत्नी झाली. तिने प्राणपणाने महर्षींची सेवा केली आणि प्रसन्न झालेल्या ऋषींनी वर मागण्यास सांगितला. देवी सुकन्येने अनेक व्यावहारिक सुखसाधनांसह ऋषींच्या तारुण्याची अपेक्षा केली. महर्षींनी देवतांचे वैद्य असणा-या अश्विनीकुमारांना पाचारण केले. त्यांनी तारुण्य प्रदानच्या बदल्यात यज्ञात आहुतीचा अधिकार मागितला. ऋषींनी होकार भरला. ऋषी तरुण झाले आणि अश्विनीकुमारांना हविर्भाग देणारा ऐतिहासिक यज्ञ महर्षींचे सासरे राजा शर्यतीकडे सुरु झाला.

यज्ञारंभीच तेथे देवराज इंद्र प्रगटले. सगळ्यांनी देवराजांचे स्वागत केले. पण देवराज आगतस्वागताच्या मानसिकतेत नव्हते. त्यांचा  आक्षेप होता अश्विनीकुमारांच्या आहुती ग्रहणाला. त्यांच्या लेखी ते रोगनिवारक सेवक आहेत. त्यांना समान दर्जा देवराजांना मान्य नव्हता. मात्र महर्षी च्यवन आपल्या मतावर ठाम होते. ते म्हणाले हा माझा शब्द आहे मी पाळणारच. अश्विनीकुमारांना आहुती मिळणारच.

देवराज प्रचंड संतापले आणि त्या संतापाच्या भरात त्यांनी चक्क वज्रच उगारले. सगळयांनी डोळे मिटले ऋषीवध पाहण्याचे पाप नको म्हणत मिटलेले डोळे थोडया वेळाने उघडले तर सगळयांना आश्र्चर्याचा मोठाच धक्का बसला. देवराजांना वज्र धरलेला हात हवेतल्या हवेत जणू गोठला होता. त्यांना हात हलवताच येईना.

उलट पक्षी माझ्यावर वज्र चालवतो म्हणजे काय? या विचाराने संतप्त महर्षी च्यवनांनी एक भीषण आरोळी ठोकली आणि त्यातून एक अक्राळविक्राळ राक्षस प्रगट झाला. प्रगटताच तो इंद्रावर चालून गेला. आधीच हात बंदिस्त त्यात अंगावर राक्षस. इंद्रांना शरण येण्याशिवाय पर्यायच नव्हता. त्या शरणागतीने ऋषी प्रसन्न झाले. देवराज सुटले. अश्विनीकुमारांना यज्ञात स्थान भेटले. सगळा यज्ञ संपन्न झाला. त्या निर्मित विघ्नाचे काय?

महर्षी आपल्या त्या तत्कालिक विकार ग्रस्ततेने व्यथित झाले आणि त्यावर उपाय विचारण्यासाठी स्वपिता, स्वगुरू महर्षी भृगुंच्या आश्रमात आले. महर्षी भृगु म्हणाले आपल्या मदपूर्ण दशेत, आत्मप्रभावाच्या मदाने परिपूर्ण होत तू निर्माण केलेला हा राक्षस मदासुर नावाने जगताला 'त्राहीभगवान!' करायला लावेल. एक परब्रह्म परमात्मा श्री गणराज प्रभूच आता यातून वाचून शकतात. त्यांनाच शरण जा आणि नियतीच्या परिणामाला लागणा-या काळाची प्रतीक्षा कर.

तिकडे मदासुर दैत्यगुरु शुक्राचार्यांना शरण गेला. दैत्यगुरुंनी असुर राज्याच्या उत्कर्षाचे ते कारण पाहिले आणि त्याला आदिशक्तीच्या उपासनेस बसविले. घोर तपाचरणाच्या परिणाम रुपात आदिमायेने अनेकानेक अद्भुत वरदाने, त्रैलोक्य विजय आणि पंचमहाभूतात्मक कोणत्याही पदार्थाच्या योगे मरण नसल्याचा अद्भुत वर दिले.

आता मदासुराच्या लेखी तो अमरच होता. परिणामी त्याची राक्षसीवृती प्रदीप्त झाली. 'स्त्रीमांसमदिरासक्त:!' या राक्षसीवृत्तीने त्याने त्रिभुवनाला गिळंकृत केले. मदासुर त्रिलोकनाथ झाला.

सगळया देवतांना आपापली पदे रिकामी करून द्यावीच लागली. देवता स्वर्गच्युत झाल्या. सगळयांनी आदिशक्तीच्या शरणतेचा मार्ग स्वीकारला. तिनेही सगळयांचे स्वागत केले. भोळा आशावाद मांडला की तो माझा भक्त आहे. माझ्या लोकात येऊन गोंधळ घालणार नाही. तुम्ही येथे सुखनैव रहा. देवतांना तात्कालिक आराम मिळाला.

देवतांचे हे आदिशक्ती शरणागतत्व राक्षसांना कळले ते संतापले. मदासुरास म्हणाले शक्तीलोकावर आक्रमण करून सगळयांना संपवू. मदासुर प्रारंभी तयार होईना पण सगळयांनी सांगितले. जगदंबा आमच्या पक्षात असेल तरच आम्हास

पूज्य. ती शत्रूंना आधार देत असेल तर तिला आदर कां द्यायचा? मदासुरास हे विवेचन पटले आणि श्रीआदिशक्तीच्या मणिद्वीप लोकावर आक्रमण करण्यात आले.

युद्धाचा परिणाम ठरलेलाच होता. मदासुर जिंकणारच होता. आता देवतांच्या नशिबात वनवासाला पर्यायच नव्हता. देवता अन्नान्नदशेत वनवास भोगू लागल्या.

तपाचरण करू लागल्या. तपाने शुद्ध झालेल्या त्यांच्या पुण्यफलरुपात सनकादिक ऋषींचे तेथे आगमन झाले. त्यांनी देवतांना श्रीगणेश रहस्य सांगितले. सनकादिकांच्या उपदेशानुसार देवतांनी गणेशाराधन केले आणि परिणाम रुपात स्वानंदनाथ परब्रह्म 'एकदंत' रुपात अवतीर्ण झाले.

श्री एकदंतांचा आणि राक्षस सैन्याचा आमनासामना झाला. विषयी, लोलुप आणि धनप्रीय या मदपुत्रांच्या विनाशानंतर श्रींनी मदासुराला आपले रहस्य कथन केले आणि शेवटी मदासुर श्री एकदंतांना शरण आला.

ही झाली श्री एकदंत अवताराची कथा कथनीय पाहू आगामी चतुर्थीला.

जय गजानन! जय गणेश!

संदर्भ ग्रंथ:- श्री मुदगल पुराण

जय गणेश आज विनायकी चतुर्थी

मोहासुर विनाशक श्री महोदर विनायक

कधीकाळी तारकासुर नामक एक भयावह राक्षस जन्माला आला. त्याने भगवान श्री ब्रह्मदेवांची कठोरतम तपश्ऱ्चर्या केली. पितामह प्रकट झाले. याने वरदान मागितले की मला मृत्यू नसावा. श्री ब्रह्मदेव म्हणतात की हे संभवच नाही. जर मलाच अंत आहे तर मी तुला अनंत कसे करू शकेल? हा फार तर मृत्यू कसा असावा ते मग. ते देता येईल.

तारकासुर विचारात पडला. नेमक्या याच संधीचा लाभ घेण्यासाठी देवर्षी नारद तेथे उपस्थित झाले. त्यांनी तारकासुरास उपाय सांगितला. भगवान शंकरांची पत्नी देवी सती दक्षयज्ञात भस्म झाली आहे. शंकरांना बायकोच नाही. मग पुत्र होण्याचा प्रश्नच नाही. तू शिवपुत्राच्या हातून मृत्यू माग म्हणजे तू अमरच होशील.

देवर्षींच्या दूरदृष्टीची अत्यल्पही जाणीव नसलेला राक्षस या जाळयात बरोबर फसला. त्याने ब्रह्मदेवांना तसेच वरदान मागितले. ब्रह्मदेव म्हणाले 'तथास्तु!' आपण अमर झालो या आनंदात तारकासुर निघाला आणि त्याच्या तपश्ऱ्चर्येच्या परिणाम वशात शिवविवाहाची बीजे रोवल्याच्या आनंदात देवर्षी नारद गमन करते झाले. नियतीच्या चक्राने वेगळी गती घेतली.

तारकासुराने जगताला, त्रैलोक्याला त्राही त्राही करण्यास भाग पाडले. सगळ जग जिंकले. देवताही वनवासी झाल्या. पण तारकासुर विनाशाचा उपायच हाती लागेना. प्रत्यक्ष शंकरांनाही प्रार्थना करून उपयोग नव्हता कारण प्रश्नाचे समाधान होते -'शिवपुत्र'.

देवतांची ही समस्या सोडविण्याचे कार्य देखील देवर्षी नारदांनीच केले. त्यांनी देवतांना सांगितले की पूर्वजन्मीची सतीच या जन्मात हिमाचल कन्या पार्वती रुपात अवतरीत झाली आहे. हा आशेचा किरण दिसताच सगळया देवता हिमाचलाकडे आल्या. आईसाहेबांच्या नविनरूपाचे दर्शनाने धन्य झाल्या.

सगळयांनी त्यांना अवतार कार्यार्थ प्रार्थना केली. पण प्रश्न वेगळाच होता. भगवान श्री भोलेनाथ अथांग समाधीत गढून गेले होते. त्यांना देहभानावर आणल्या शिवाय ना विवाह संभव होता ना संतती.

हे कार्य करणार कसे? शेवटी सगळयांनी मिळून ही जबाबदारी भगवान मदनांवर सोपविली. श्री कामदेव आपला सखा वसंतासह कामगिरीवर लागले. भिल्लीणीच्या वेषात देवी पार्वतीला समोर ठेऊन श्री मदनांनी अमोघ बाणाचा प्रहार केला.

नेमका परिणाम घडला. भगवान योगनिद्रेतून बाहेर आले. समोर दिसली देवी पार्वती. त्या अतुलनीय रूपाचा परिणाम झाला आणि योगीराज राजेश्वर श्री भोलेनाथही पाघळले. प्रदीर्घ काळापासून संचित भावनांना अचानक उधान आले आणि श्रीशंकर स्खलित झाले.

नंतरच्या काळात शिवनेत्राग्नीने मदनदाह शिवपार्वती विवाह देवसेनापती स्कंदांचा जन्म आणि त्यांच्याद्वारे तारकासुर वध

. सर्वज्ञात भाग यथारूप पार पडला.

मात्र देवी पार्वतीच्या प्रथम दर्शन समयी पतित झालेले शिववीर्य व्यर्थ कसे जाणार? त्यापासून एक भयावहकाय राक्षस जन्माला आला. श्रीशिवांना पार्वतीरूपाच्या झालेल्या मोहाच्या परिणाम रुपात प्रगटलेला तो राक्षस इतिहासात मोहासुर नावाने ओळखला गेला.

मोहासुराचे पालकत्व जृंभासूर नामक राक्षसाने स्वीकारले. श्रीशुक्राचार्यांचे शिष्यत्व घेतलेल्या मोहासुराने प्रारंभिक साधना केली.

जृंभासुराच्या मनात आता त्याच्या विवाहाचे विचार आले. प्रमदासुर नामक राक्षसाची 'मदिरा' नामक कन्या मोहासुरपत्नी झाली. तिच्या पासून मोहासुरास उग्र, क्रूर, मेधावी, शोधन आणि हरण नामक पाच पुत्र झाले. संसारातील सर्वसुखे मोहासुरासमोर हात जोडून उभी होती. पण अशा चाकोरीबद्ध संसारासाठी मोहासुर जन्मालाच आला नव्हता. त्याला विश्वविजयाची स्वप्ने पडू लागली. शेवटी तो विचार प्रवाह अतिप्रबल झाला आणि सगळयांना बोलावून आपला विचार सांगितला आणि मोहासुर महातपस्येकरिता गहन वनांतरी प्रवेशला.

श्री शुक्राचार्यांचे कथन होते कोणतीही महान गोष्ट करायची तर सर्वप्रथम हवे सदृढ, आरोग्यसंपन्न शरीर 'आरोग्यं भास्करादिच्छेत!' अर्थात आरोग्य श्रीसूर्य नारायणांकडून प्राप्त होते. अत: मोहासुर श्रीसुर्योपासनारत झाला. अखंड सूर्योपासना  सुरु होती तोवर श्री सूर्य प्रकट झाले नाही.

अनेकानेक वरदान संपन्न झालेला मोहासुर परतला. श्रीगुरू शुक्राचार्यांनी राज्याभिषेक केला आणि राक्षसराज मोहासुर त्रिभुवन विजयार्थ सज्ज झाला. अर्थात विजय हा केवळ औपचारिकतेचाच भाग होता त्याच्या वरदान प्राप्त बलासमोर टिकण्याची क्षमता आता पंचेश्वरांमध्येही नव्हती. कारण वरदानच होते की 'नामरूपात्मक कशानेही मृत्यू व पराभवही नसावा?

भारत वर्षातील एका निबिड अरण्यात वनवासी झालेल्या देवतांची मोहासुर विनाशोपायार्थ बैठक झाली. मात्र उपाय कोणाच्याच जवळ नव्हता. शेवटी सगळयांनी श्री सुर्यांनाच विनंती केली की तुम्हीच वरदाने दिली आता तुम्हीच मार्ग सांगा.

श्री सूर्यांनी देवतांना कर्मसिद्धांत सांगण्यास आरंभ केला. ते म्हणाले आज मोहासुर अजेय आहे कारण त्याची पूर्व कर्मे. आपणही असे निर्वासित आहोत कारण आपली पूर्व कर्मे. ज्यावेळी आपण सत्तेत असतो त्यावेळी ती सत्ता ज्याच्या कृपेने लाभली त्या गणनाथास विसरतो. आपापल्या स्वर्गीय भोगात रमतो अत: पदच्युत होतो. त्या काळात राक्षसाने तप केले. पुण्य कमावले त्याचे फळ तो आता  भोगत आहे. त्याचे पुण्यफल संपण्याची वाटच पाहावी लागेल आणि तोपर्यंत आपले पुण्यबल वृद्धिंगत करावे लागेल. तरच लाभ होईल. दुसरी बाब म्हणजे त्याला वरदान आहे की नामरूपात्मक कशानेही त्याला भय नाही आणि नामरुपातीत तत्व आहे एकटे श्री गणराज प्रभू. अत: त्यांना शरण जाण्याशिवाय अन्य पर्यायच नाही.

श्री सूर्यांच्या कथनाला सगळयांनी मान्यता दिली आणि परिणाम रुपात सगळ श्रीगणेशोपासनेत रममाण झाले. सगळयांची तपस्या फळाला आली आणि भगवान श्री स्वानंदनाथ मोहासुर विनाशक श्री महोदर रुपात प्रकट झाले.

श्रींनी मोहासुरास समजावण्यासाठी प्रथम देवर्षी नारदांना पाठविले. नारदांनी त्यास गणराज अवतरणाबाबत सांगितले आणि शरण येण्यास सांगितले. त्यानंतर नारदोपदेशाने भारावलेल्या मोहासुरास पूर्ण नि:संशय करण्यासाठी श्रींनी श्रीविष्णूंना पाठविले.

श्रीहरींनी त्याला महोदरत्वाचे रहस्य समजावून सांगितले. नामरूपातीत स्वानंदनाथ केवळ लीलारुपात आज महोदर झाला असला तरी ते निर्गुण निराकार परब्रह्मच कसे आहे हे समजलेला मोहासुर श्रीगणराज चरणी शरण आला.

ज्या सहजतेने त्याने ब्रह्मांड जिंकले होते त्याच सहजतेने भगवंतांनी त्याला सकल त्यागास प्रवृत्त केले आणि मग आपल्या गणांमध्ये स्थान दिले.

ही महोदर अवताराची श्री मुदगल पुराणाच्या तृतीय खंडातील कथा. हा शंकरांपासून कसा जन्माला येतो? मदिरेसोबतच कां विवाह करतो? श्रीसूर्य कर्ममार्गच कां सांगतात? महोदरत्वाचे रहस्य काय? मोहासुराचा विनाश महोदर कसे करतात?

. रहस्याचा विचार नेहमी प्रमाणे कृष्णचतुर्थीस पाहू. तोवर जय गजानन!

जय गणेश!

अधिक माहिती करता संपर्क
स्वानंदशास्त्री गजानन पुंड
ईमेल: sgpund@rediffmail.com
For More Details Visit Our Website: www.dagdushethganpati.com

!!जय गणेश !!आज संकष्टी चतुर्थी !!

'लोभासुर निर्दालक श्री गजानन अवतार'

एकदा भगवान श्री भोलेनाथांनी कैलास पर्वतावर एक महोत्सवाचे आयोजन केले. सगळया ब्रह्मांडात आमंत्रणे पाठविण्यात आली. प्रत्यक्ष कैलासनाथाचे आमंत्रण म्हटल्यावर सगळयाच देवीदेवता आपल्या संपूर्ण वैभवानिशी उपस्थित झाल्या. एकेक देवता समोर येत होती. शिवपूजन करून, नजराना प्रदान करून आशीर्वाद घेत होती. आरंभी श्रीहरी तथा श्रीब्रह्मदेवांशी गळाभेट झाल्यावर भगवान आसनाधीश झाले आणि मग सगळया देवतांचा क्रम लागला. एकेक देवता समोर येत होत्या. त्यात थोडयावेळाने क्रम लागला देवतांचे खजिनदार अलकानगरीचे राजे श्रीकुबेरांचा. रसिक गण रूप यक्षांचे राजे श्रीकुबेर म्हणजे रसिकतेचा मेरुमणी. श्रीकुबेरांनी श्रीशीवपार्वतीचे वंदन पूजन केले. मात्र दर्शनार्थ कुबेरांची मान वर गेली आणि वृत्ती अध:पतित झाली. आई जगदंबा पार्वतीचे ते त्रैलोक्यसुंदरीरूप पाहून वात्सल्यभाव जागृत होण्याऐवजी श्रीकुबेरांच्या मनात कामभावना जागृत झाली. श्रीकुबेरांच्या नजरेतील ते परिवर्तन देवी पार्वतीने टिपले आणि ती भीषण संतापली. माझ्याकडे पाहून अशी भावना जागृत होतेच कशी? अशा भीषण रागाने तिने कुबेरांकडे भेदक नजर फेकली आधीच उफाळलेली कामवासना आणि त्यात मातेच्या विश्‍वविनाशक क्रोधाचा बसलेला दणका श्रीकुबेर स्खलित झाले. आणखीनच लज्जित झाले. तशीच मान खाली घालून बाहेर पडले. सगळी सभा स्तंभित झाली होती.

जगदंबा अत्याधिक संतापली. शेवटी श्रीभोलेनाथांनीच शांत केले. ते म्हणाले अग! अशी संतापतेस कशाला? तू आहेसच इतकी सुंदर की युगायुगाची समाधी सोडून मी तुझ्या सौंदर्याने घायाळ झालो मग त्या बालकाचा काय दोष? जाऊ दे माफ कर. क्षमाशीला आहेस तू. श्रीशंकरांच्या बोलण्याने पार्वती शांत झाली. मग त्यांनी कुबेरास बोलावून घेतले. त्यांचीही समजूत काढली. त्यांची अवस्था मेल्याहून मेल्यासारखी झाली. पण श्रीशंकरांनी समजावले. त्या शक्तीपतनातून निर्माण झालेल्या त्या मुलास घेऊन जाण्यास सांगितले. श्रीकुबेरांची इच्छाच नव्हती. पण या सगळया प्रकारानंतर आणि त्यातही श्रीशंकरांना नाही म्हणायची त्यांची ताकदच नव्हती त्यामुळे नाईलाजाने कुबेर बालकासह अलका नगरीत परतले.

नियतीने तिकडे एक वेगळाच डाव मांडला. पाताळामध्ये तार नामक राक्षस आपल्या कुळाच्या भावी वृद्धीसाठी चिंताग्रस्त होता. राक्षसराज्य त्रैलोक्यावर कसे प्रस्तापित होईल या चिंतेत होता. कर्मधर्म संयोगाने देवर्षी नारदा तेथे आले. देवर्षी देवतांइतकेच दैत्यांनाही पुज्य वाटतात. ताराने त्यांची पूजा केली आणि आपली समस्या सांगितली. देवर्षीच्या मुखातून नियतीने आपली चाल पुढे केली. श्रीनारदांनी त्यास सांगितले की अलका नगरीत जा कुबेराच्या नवजात बालकास पळवून आण. त्याच्याद्वारे तुझ्या सगळया मनीषा पूर्ण होतील. तार राक्षस अलकेस पोहचला बालकास पळवून मोकळा झाला.

देवखजिनदार कुबेरास वार्ता कळली पण त्यांचा मुलाच्या ठायी लोभच नव्हता त्यामुळे पळवून नेल्याचे त्यांना दु:ख झालेच नाही. मुलाठायी लोभ नसला तरी जगदंबेच्या रूपाप्रती निर्माण

झालेल्या लोभापायी जन्माला आलेल्या त्या बालकाचे नाव भविष्यात लोभासुर असेच झाले.

ताराने बालक दैत्यगुरु शुक्राचार्यांकडे नेले. बालकाच्या मस्तकलेखास पाहुन त्यांनी त्यास श्रीशिवपंचाक्षरी महामंत्राचा उपदेश दिला. बालकाने अचाट तप:श्चर्या केली आणि परिणाम रुपात त्रैलोक्य विजयासह मनोवाणीमयापासून मृत्यु नसावा असा अपूर्व वर लाभला.

वरदान संपन्न लोभासुराने श्रीशुक्राचार्यांच्या आशीर्वादानंतर सकल त्रैलोक्यास वश केले. देवतांवर नेहमीप्रमाणे वनवासाची वेळ आली.

अडचण आल्यावरच भगवान आठवतात या नियमाला देवताही अपवाद नसतात. समस्याग्रस्त, वनवासी देवता लोभासुर निर्दालनाचा विचार करू लागल्या पण उपाय दिसेना. बराच काळ गेला आणि त्याकाळातील तपाच्या फलरुपात महामुनी रैभ्यांचे तेथे आगमन झाले. सगळयांनी त्यांची महापूजा केली आणि उपायार्थ प्रार्थना केली. महर्षी रैभ्यांनी सकलमनोकामना पूरक एकमेव उपाय वर्णिला श्रीगणेशोपासना.
सगळया देवतांनी, ऋषीमुनींनी गणेशाराधानेला महामार्ग जोपासला आणि परिणामरुपात भगवान श्री स्वानंदनाथ 'गजानन अवतार धारण करते झाले.

श्रीगणेशांनी आरंभी श्रीशंकरांना शिष्टाई साठी पाठविले पण त्याचा काहीच उपयोग झाला नाही. राक्षसराज युद्धार्थ सज्ज झाला. मग मोरयांनी लीला रुपात आपला परशु सोडला. त्यातून निघालेल्या भीषण अग्निज्वालांनी दैत्य सैन जळू लागले. लोभासुराने त्यावर पर्जन्यास्त्राचा प्रयोग केला. पण त्याने हतप्रभ व्हायला ते सामान्य अग्निअस्त्र थोडेच होते. त्याने पर्जन्यास्त्रही सुकविले आणि तरीही अग्निवर्षाव सुरूच राहिला. या अकल्पित प्रकाराने भयभीत लोभासुर श्रीशुक्राचार्यांना शरण गेला. दैत्यगुरुंनी त्यास श्रीगजानन रहस्य समजावून दिले. ते आपण आगामी चतुर्थीस पाहू तोवर

जय गजानन!जय गणेश!

अधिक माहिती करता संपर्क
स्वानंदशास्त्री गजानन पुंड
ईमेल: sgpund@rediffmail.com
For More Details Visit Our Website: www.dagdushethganpati.com

श्रीगणेशायनमः

रहस्य लंबोदरत्वाचे

भगवान श्री गणेशांच्या श्री मुद्गल पुरोणोक्त अष्ट्विनायकांपैकी पाचवा अवतार आहे. श्री लंबोदर अवतार. आपल्या सगळ्यांसाठी या अवताराचे आगळे आपलेपण म्हणजे भगवान श्री लंबोदराचे महराष्ट्रीयत्व. भारताच्या आठ दिशांना अष्ट दिशा रक्षक रूपात विदयमान या मूळ अष्टविनायक स्थानांपैकी पश्चिम दिशा रक्षक भगवान श्री लंबोदराचे स्थान महाराष्ट्राच्या पाश्चिम सागर किनाऱ्यावर आहे. ज्या स्थानास आपण 'श्री क्षेत्र गणपती पुळे' नावाने ओळखतो.

क्रोधासूर नामक राक्षसाच्या नियंत्रणार्थ भगवान श्री लंबोदराचा अवतार झाला. हे नावच मोठे सुंदर आहे. केवळ वाच्यार्थ्याने घेतल्यास पोटाचा नगारा झालेल्या स्थूलदेहीला लंबोदर म्हणता येते. मात्र हा अर्थ सर्वस्वी अस्थानी आहे. मोरयाचे चित्र का मूर्ती याच बाह्यार्थाने केलेल्या आपणास दिसत असल्या तरी हा अर्थ शास्त्रकारांना अभिप्रेत अर्थ नाही. मग काय आहे शास्त्रसंमत अर्थ?

श्री मन्मुद्गल  महापुरान श्री लंबोदर शब्दाचा गुढार्थ विशद करताना सांगते की -

यस्योदरात विश्वमिदं प्रसूतम !

ब्रह्माणि तद्वज्जठरे  स्थितानी !

अनंतरूपं जठरं हि यस्य !

लंबोदर तं प्रणतो ऽस्मि नित्यम !

ज्यांच्या उदरातून ही अनंतकोटी ब्रह्मांडे उत्पन्न होतात तथा अंतिमतः ज्या उदरातच ती विलीन पावतात. ज्या उदरातच ईश्वर , महेश्वर रूप अनंत ब्रह्मांची लीला सुरू असते अशा ज्या जठराचा कधी अंतपारही  गवसत नाही त्या सकलनिर्माता , सकल आत्मसातकर्ता महाउदर धारीस श्री लंबोदर असे म्हणतात.

श्री लंबोदर अवताराचे प्रयोजन असते क्रोधासूर निबर्हण. क्रोधासूराच्या उत्पत्तीचे कारण आपण गत लेखात पाहिले. भगवान श्री विष्णूंच्या मोहिनी रूपावर श्री शंकर भाळले.तिच्या मागे  धावले अगदी मांडीवरची जगज्जननी देवी पार्वती सोडून धावले.

हाच असतो कामप्रभाव. ' कामातुराणां न भयं न लज्जा । ' असे सुभाषितकार सांगतात. जेथे भगवान श्री शंकरांची ही अवस्था तेथे सामान्यांचे काय? हा कामच अन्य दोन विकारांचे मुळ स्थान असतो. कामपुर्ती झाली तर लोभ बळावतो. पुन्हा पुन्हा त्याच कामनांच्या पूर्तीची अनंत शृंखला मनी रूजते. ह्या इच्छापूर्तीच्या वारंवारतेची उत्कट इच्छाच लोभ रूपात अतृप्त ठेवते ; आणि समजा काम पूर्ण नाही झाला तर परिणाम एकच असतो " क्रोध "

कामनांच्या अपूर्णतेचा, काम्य वस्तूच्या अप्राप्तीचा सहज परिणाम असतो क्रोध. क्रोध ही क्रिया नाहीच ती प्रतिक्रियाच आहे आणि असा प्रतिक्रियायुक्त जीव कधीच सुखी समाधानी होऊच शकत नाही. मनुष्य क्रियेने सुखी होईल किंवा नाही हे निश्चित सांगता येणार नाही पण तो प्रतिक्रियेने कधीच सुखी होऊ शकत नाही  हे मात्र निर्विवाद सत्य होय.

क्रोधाचे निरूपण करताना आणखी काही बाबींचा बारकाईने विचार शास्त्रकार मांडतात. क्रोधाचे कारण अयोग्याकांक्षा हेच असते. सुयोग्य आकांक्षा तर शास्त्रशुद्ध मार्गाने, शुद्ध आचरणाने सुगम असतात. मात्र अयोग्य आकांक्षांची पूर्ती संभव नसते, कदाचित झाल्यासारखी वाटत असली तरी निश्चितपणे मार्ग योग्य नसतो आणि मग परिणाम सुयोग्य असण्याची संभावनाच नसते. अंततः क्रोधाशिवाय अन्य काहीही हाती लागत नाही.

देवी पार्वतीच्या मनी शिवप्राप्तीची मनीषा उद्भवणे शास्त्रसंमत असते आणि म्हणूनच आरंभी श्री शिवांची इच्छा नसली तरी नियतीने शिवपार्वती मीलन घडवून आणले. उलटपक्षी श्री शिवांच्या मनी अद्भूत मोहिनी आकांक्षा अशास्त्रीय असल्याने श्री शिवांची इच्छा असूनही परिणाम सुखकारक होत नाही. जणु कथा हेच अधोरेखित करते की अयोग्य आकांक्षा श्रीशंकरांचेही पतन घडवू शकते मग आपले काय?

अधर्मेच्छा अपूर्णच राहणार आणि परिणाम केवळ क्रोधातच होणार. क्रोधाची सगळ्यात मोठी अडचण असते ती म्हणजे क्रोध हा आगपेटीच्या काडी प्रमाणे असतो. आत असेल तो वर सुरक्षित , शांत ती काडी बाहेर आली की घर्षणाची संभावना वाढते आणि मग थोड्याही घर्षणानंतर परिणाम ठरलेलाच आहे भडका उडणे. या भडक्यात जगाला जाळण्याची क्षमता आहे पण गंमत पहा काडी जगाला जाळेल की नाही ते नाही सांगता येत पण भडकली की ती स्वतः नक्की जळते. क्रोधाचेही असेच आहे क्रोध येतो कोणामुळे तरी. पण त्याचे नुकसान करण्यापूर्वी तो ज्याला आला त्याला तर जाळून मोकळा करतोच करतो.

मग अशा क्रोधाला उपाय काय? तर लंबोदर आराधना. भगवान लंबोदरांच्याच कृपेने क्रोधाचे शमन संभव आहे. क्रोध कशाने येतो? तर जी बाब हवी आहे ती न मिळाल्याने. बरे मिळाली तरी क्रोध संपतो का? तर नाहीच. कारण मिळाल्यावरही आणखी दोन बाबी उद्भवतात. एक म्हणजे मिळालेली गोष्ट तशीच रहावी आणि दुसरी म्हणजे आणखी उत्तम मिळत जावी. वेगळ्या शब्दांत ही अनंत प्रक्रियाच आहे. याचा अंत केव्हा संभव आहे? तर त्याचा वेळी जेव्हा सगळ्या अपेक्षित बाबींचाच विलय होईल. दुसरा एका सोपा मार्ग आहे बाबींचा विलय न होता त्यांच्या आकांक्षांचाही विलय होणे. मग त्या मिळाल्या काय? किंवा न मिळाल्या काय? त्याची परिणती क्रोधात होत नाही हे निश्चित.

अशा समस्त ब्रह्मांडांचा आणि त्या ब्रह्मांडस्थ वस्तूंच्या आकांक्षांचे ज्या अनंत उदरात विलीनत्व घडते त्यांस श्री लंबोदर म्हणतात. / त्या वस्तूंची आकांक्षा तरी कां असते / तर त्यापासून सुख प्राप्त होते असा भ्रम असतो. सुख मिळणारच नाही अशी खात्री ज्या वस्तूबाबत , पदार्थाबाबत असते त्याच्या न मिळण्याने क्रोध उद्भवतच नाही.

अशाच स्वरूपात सकल पदार्थाचे अनित्यत्व लक्षात घेवून, त्यापासून नित्य आनंद संभवच नाही हा दृढ विश्वास मनी ठसल्यामुळे त्यांच्या त्यागाची सहजप्रेरणा आहे श्री लंबोदर उपासना.

गाणपत्य सम्प्रदायात या जगताला असत ब्रह्म अथवा शक्तिब्रह्म असे म्हणतात. असत या करिता की या जगातील कोणताही पदार्थ हा चिरंतन नाही, शाश्वत नाही. परिवर्तन हाच या जगाचा अपरिवर्तनीय विशेष आहे. मात्र असे असले तरी या पदार्थांना स्थल, काल, वस्तु सापेक्षरीत्या का होईना पण विशिष्ट सत्ता आहे,

उपयोगित्व आहे, लाभदायकत्व आहे. हीच त्या पदार्थांची शक्ती आहे. अतः यास शक्तिब्रह्म म्हणतात.

याच कारणाने श्रीलंबोदरांना शक्तिब्रह्म म्हणले आहे. पंचमस्कंधात ' तीच शक्ती तोच विनायक ' अशा रूपात वर्णन आहे. तो परब्रह्म परमात्मा विनायकच शक्तिरूपात सृजन करतो. श्रीगणेशांच्या याच रूपाचे प्रतीकात्मक साकाररूप म्हणून ' गणेशानी ' च्या मूर्ती, चित्रे निर्माण झाली आहेत. स्त्री रूपातील गणेश विग्रह असे 'गणेशानी' चे स्वरूप असते. हे शक्तिब्रह्म गणेश होत. याचा स्वरूपास श्रीमुद्गलपुराण पंचमावतार श्रीलंबोदर संबोधते.

जय श्री लंबोदर ।

जय गजानन ।

क्रोधासुर नियंत्रक भगवान श्री लंबोदर !

राक्षसवीर शृंखलेत एक भयानक नाव आहे ते म्हणजे भस्मासुर. भगवान श्री शंकरांच्या अघोर तपानंतर त्याने जगाच्या इतिहासात कोणीही कधी न मागितलेले वरदान मागितले 'मी ज्याच्या डोक्यावर उजवा हात ठेवील तो तत्काळ भस्म व्हावा' तपाच्या प्रभावासमोर श्रीशंकरांचाही नाईलाज होता. राक्षस कोणालाही भस्म करू शकण्याच्या क्षमतेमुळेच भस्मासुर नावाने विख्यात झाला.

वरदान तर मिळाले पण त्याचवेळी त्याच्या मस्तकात एक राक्षसी विचार आला की हे वरदान खरे कसे? तपासणी करायला हवी. त्याच क्षणी समोर शंकर आहेत असे पाहून तो हात वर करून त्याच्याचकडे येऊ लागला. त्याला तसे येताना पाहून श्रीशंकर मनोमन म्हणाले कोण्या माकडाच्या हाती आपण कोलीत दिले. पण आता विचार करण्यात अर्थ नव्हता. पळण्याशिवाय पर्यायच नव्हता. समोर श्रीशंकर आणि मागे हात वर केलेला भस्मासुर अशी शर्यत सुरु झाली.

श्री भोलेनाथ कैलासावर आले. राक्षस तेथे आला. त्याला समोर दिसली माता पार्वती. तिच्या त्रिपुरसुंदरी सौंदर्यावर हा भाळला आणि शंकरांना सोडून तिच्याकडे वळला. त्याच्या आसुरी वृत्तीची जाणीव झालेली जगन्माता क्षणात गुप्त झाली.
ती गुप्त झाली म्हटल्यावर आचंबित झालेला तो पुन्हा शंकरांच्या मागे लागला. या निरुपाय विघ्नावर अंतिम उपाय रुपात श्रीशंकरांनी श्री विघ्नराजाचे स्तवन आरंभिले.

भगवान श्रीगणेशांनी प्रेरणा दिली आणि वैकुंठनाथ श्रीहरींनी अलौकिक सौंदर्यवतीचे रूप धारण केले. मार्गात त्या रुपवतीला पाहताच शंकरांना सोडून राक्षस थांबला. त्या मोहिनीला विवाहयाचना करू लागला. ती म्हणाली तुझ्या समान महानवीराची अर्धांगिनी होणे कोणालाही आवडेलच. पण आत्ता मला नृत्याची इच्छा आहे. तू माझ्यासह माझ्याच सारखे नृत्य केले तर मी तुझी होईल.
विश्वविजयाची अफाट क्षमता अंगी असलेला तो अफाटवीर त्या स्त्रीच्या तालावर नाचू लागला. बराच वेळ त्याला नाचवून नाचवून दमवल्यानंतर श्रीहरींनी नृत्यातील एक अवस्थारुपात आपला उजवा हात आपल्याच डोक्यावर ठेवला. 'सारखे' नृत्य करण्याच्या नादात भस्मासुरानेही तसेच केले आणि विश्वाचे हे संकट स्वहस्ते जळून गेले.

मध्यकाळात घडलेली ही मोहिनीलीला न कळलेले श्रीशंकर धावतच होते. पण थोडयावेळाने मागे कोणीच नाही हे कळल्यावर ते थांबले. श्रीगणराज कृपेने आपल्यावरील संकट टळले म्हणून धन्यवाद देऊन मोकळे झाले.
काही काळाने मुकुंदपूर नामक ग्रामी त्यांना मोहिनीलीलेचा सगळा कथाभाग एका देवसम्मेलनात कळला. त्यावेळी त्यांनी ते अतिसुंदर रूप दाखवावे यासाठी श्रीहरींनी विनंती केली. श्रीहरी म्हणतात त्या विशिष्ट क्षणी गणराज प्रेरणेने घडलेली ती क्षणिक घटना होती आता ते कसे करणार? पण श्रीशंकर हट्टालाच पेटले आणि शेवटी श्रीहरींचा नाईलाज झाला.

मोहिनीच्या त्या जगन्मोहक रुपाकडे पहिले आणि मदनारी शंकर, आपण कोण आहोत? कुठे आहोत? हे कोण आहेत? जवळ पार्वती आहे हे सगळे विसरून तिच्याकडे झेपावले.

कामदेव दाहक श्रीशिवांना काममोहितरीती असे येताना पाहून श्रीहरी मुळ रुपात प्रगटले. श्रीशंकरांना तो धक्का असहनीय होता. सगळयांसमोर आपल्याकडून घडलेल्या या पशुतुल्य वर्तनामुळे त्यांना स्वत:चाच अनावर क्रोध आला आणि त्या रागात ते तेथून प्रस्थान करते झाले.
मात्र मोहिनीच्या रुपात कामातुर झालेल्या श्रीशिवांच्या पतितवीर्यातून एक भयानक राक्षस प्रगट झाला पुढे तो दैत्यगुरु शुक्राचार्यांकडे आला दैत्यगुरुंनी विचारले तू कोण? त्याच्याजवळ काहीच उत्तर नव्हते. तो बोलत नाही म्हटल्यावर श्रीशुक्राचार्यांनी ध्यान लावले. सर्व कथाभाग कळलेल्या त्यांनीच त्याच्या उत्पत्तीनुसार त्याचे नामकरण केले 'क्रोधासुर'.

दैत्यगुरुंच्या आदेशानुसार त्याने श्रीसुर्यांचे आराधन केले आणि अन्य वरदानांसह प्रधान वरदान मागितले उत्पत्ती, स्थिती आणि लय असणा-या कशापासुनही मरण नसावे.

वरदानासोबत आली उन्मत्तता. देवराज्य विनाशाची राक्षसी भावना. मार्ग ठरलेलाच होता. दैवी सत्ता नष्ट करायची तर धर्मसत्ता विनाश अटळ होता. तोच मार्ग चोखाळला गेला. त्राही! त्राही! करणारे देवही वनवासी ठरले.
क्रोधासुर विनाशाच्या उपायार्थ देवगुरु बृहस्पतींना प्रार्थना करण्यात आली. ते म्हणाले आपण सगळेच उत्पत्ती, स्थिती आणि लयाने युक्त आहोत आपण त्याचे काहीच करू शकत नाही. या तिन्हींच्या पार आहेत केवळ आणि केवळ श्रीगणराज आहेत त्यांना शरण जाण्याशिवाय पर्याय नाही.
देवतांच्या शरणागत तपस्येला फळ आले आणि भक्तवत्सल भगवान अवतरित झाले त्या अवतार लीलेला नाव आहे 'श्रीलंबोदरावतार'

जय श्रीलंबोदर!      जय गणेश!

अधिक माहिती करता संपर्क
स्वानंदशास्त्री गजानन पुंड
ईमेल:sgpund@rediffmail.com

भगवान श्री विकट

नानाभेदमयी माया तत्रात्मा भेदवर्जित:!

अतो विकट संज्ञो यमात्माकारो गजानन:!     यामाऽत्माकारो

श्रीमुदगलपुराण ६/४३/३९

नूतन संवत्सरातील या प्रथम चतुर्थीच्या समस्त गणेश भक्तांना सादर वंदन पूर्वक हार्दिक शुभकामना नुतनवर्षाभिनंदन मागील लेखात आपण श्रीविकट चरित्राचा कथाभाग पाहिला आता त्यामागील गुढार्थ समजून घेण्याचा प्रयास करू.

विकट शब्दाचा नेमका शास्त्रीय अर्थ श्रीमुदगल पुराणकारांनी वरील शब्दात व्यक्त केला आहे. नानाविध भेदांनी युक्त असलेल्या मायेला शास्त्रात 'कट' असे म्हणतात. कट म्हणजेच माया, कट म्हणजे वाकडेपणा, कट म्हणजे अशुद्धता. त्याशब्दास  'वि' उपसर्ग लागतो. वि उपसर्गाचा एक अर्थ विलग होणे, विलीन होणे असा आहे. अर्थात ज्या शुद्ध रूपापासून माया विलग असते त्यास विकट म्हणतात. ज्या परमशुद्ध रुपात माया विलीन होते त्या परब्रह्मास विकट म्हणतात.

मायेला भेदमयी म्हणतात. आत्मा हा भेदवर्जित असतो. अत: या आत्मरूप गजाननास विकट म्हणतात.

भगवान श्री गणेशांच्या या विकट अवताराचे प्रगटीकरण कारण आहे 'कामासूर'. वास्तविक भारतीय संस्कृती ही एकमेव अशी सुंदर तम संस्कृती की जी 'कामाला' सुद्धा परमार्थ मानते. चतुर्विध परमार्थात अर्थ आणि काम यांनाही आपली संस्कृती सन्मानाने स्थान देते. फक्त त्या पूर्वी धर्म आणि नंतर मोक्ष असे कोंदण ठेवते. या कोंदणात असलेले अर्थ आणि काम रत्नांचे सौंदर्य धारण करतात.

काम हा पुरषार्थ  आहे. एक अत्यंत नैसर्गिक भावना आहे. फक्त तिचे प्रगटीकरण विवेकपूर्ण हवे. याच कारणाने श्रीमद भगवद गीतेत भगवान श्रीकृष्ण वर्णन करतात. ' धर्माविरुद्धं भूतेंषु कामोस्मी भरतर्षभ !' हे अर्जुना धर्माला विरुद्ध नसलेला 'काम' म्हणजेच मीच आहे.

काम ही भगवंताची विभूती आहे. फक्त तो धर्माच्या विरुद्ध नसावा. तो धर्मसंमत असला. शास्त्रसंमत असला की तो पुरुषार्थ ठरतो. पण धर्म विरुद्ध झाला की असुर ठरतो. कथा नेमके हेच सांगत आहे.

योगायोग पहा काय अद्भुत आहे. कामाचे विभूती मत्व सांगणारे भगवान श्रीविष्णूच येथे कामासूर प्रगटणाचे कारण आहेत. देवी वृंदेच्या विरहात कामातुर झालेल्या श्रीविष्णुंच्या कामविव्हलतेचा परिणाम आहे कामासूर.

श्रीहरींची प्रेमभावना देवी लक्ष्मीला अधिष्ठान करून प्रगटली तर ती धर्मसंमत आहे. मात्र त्या प्रगटीकरणाचे माध्यम जर जलंधरपत्नी वृंदा ठरत असेल तर ते पाप आहे. देवी वृंदेच्या पतीव्रत्य भ्रष्टतेसाठी देवतांनीच श्रीहरींना प्रोत्साहित केले असले तरी त्यामागील उद्देश जगत्कल्याणाचा होता. श्रीहरींना वृंदेच्या प्रेमात पडायला कोणी सांगितले नव्हते. कर्तव्य आणि भावना यांच्या सरमिसळीने सर्व गडबड केली आहे.

त्यातही वृंदा पतीसह सती गेली. विषय तिथेही संपला असता. पण तसेही घडले नाही. श्रीहरी तिच्या चितास्थानी शोकग्रहत होऊन रुदन करीत बसले. तेथे तिच्या समागमाची आठवण काढत व्यथित होत बसले. ही व्यथा निरुपयोगी होती. आता वृंदेच्या प्राप्तीची कोणतीच संभावना नव्हती. असंभाव्य अप्राप्त अशा कामनेच्या पुर्तीची परिणती कामासुरातच होणार. असा काम आसुरीच ठरणार. आरंभी त्या कामग्रस्ताला आणि नंतर त्याच्याद्वारे इतरांनाही त्रासदायकच ठरणार. कथेत श्रीविष्णूंचे स्थान इतके व्यापक आहे की त्यांच्या व्यापकत्वाने त्याच्या कामजन्य विकृतीची व्याप्ती त्रिभुवनग्राही ठरली आहे.

सामान्याचा अयोग्य,अशास्त्रीय काम त्याच्या बायको, मुले, नातेवाईक, सगेसोयरे यांच्यासाठी क्लेशदायी ठरू शकेल. श्रीहरींच्या अयोग्य कामाने अखिल जगतालाच वेठीला धरले. तो सगळ्या ब्रह्मांडाच्या क्लेशाचे कारण ठरला.

सगळ्या देवता त्या कामासमोर पराजित होतात. बरोबरच आहे. कामासुरासमोर अनैतिक चारीत्र्यासमोर व्यक्तिमत्वाचे अन्य सकल देदीप्यमान गुणही काळवंडूनच जात असतात. त्या सगळ्या गुणांचे कौतुक तोवरच असते जोवर तुमचे चारित्र्य संपन्न असते. चारीत्र्यहीनता अन्य गुणांचा मृत्युपंथच ठरतो. सगळ्या 'दैवी' बाबी कामासुरासमोर हतप्रभ ठरतात.

मग उपाय काय? उपाय एकच. श्रीगुरू शरणता श्रीगुरुही कोण भेटले तर महागाणपत्य भगवान श्रीमुदगल महाराज. त्यांचे नावच किती सुंदर? 'मुद्गल' मुद म्हणजे आनंद. ज्याच्या प्रत्येक कृतीतून हा आनंद गळतो, ओसंडून वाहतो ते मुदगल.

मुद शब्दाचा नेमका अर्थ आहे 'जे आहे त्यात समाधान मानन्याने निर्माण होणारी प्रसन्नता.' मुद 'आहे'. त्याचा विचार करतो तर काम 'नाही' त्याचा. जे मिळाले नाही, जे मिळत नाही, जे मिळण्याची शक्यता नाही त्याचीच तर कामना असते. अपेक्षा, हाव या अप्राप्तीचीच असते. उलट मुदचा संबंधच प्राप्तीशी आहे. 'प्राप्त हा पर्याप्त हे!' ही भूमिकाच मुदाचा आधार आहे.

जगतातील कशाचीही प्राप्ती नसतेच. ते फारतर एकत्रीकरण असते. आज आपल्या जवळ असणारा पदार्थ हा कालपर्यंत आपल्या जवळ नव्हता आणि कधीतरी आपल्या जवळ नसणार आहे. वेगळ्या शब्दात त्या पदार्थाच्या आजच्या प्राप्तीला नेमका अर्थ किती? आजही प्राप्तीही मर्यादितच आहे. वेगळ्या शब्दात ही प्राप्ती कधीही कधी अप्राप्तीतच परिवर्तित होणार आहे. मग प्राप्ती कशाची हवी?

प्राप्ती हवी नित्यप्राप्तीचीच आणि नित्यप्राप्त काय आहे तर एकमेवाद्वितीय श्रीगणराज प्रभू. कारण ते एकच नित्य आहेत. त्यांची प्राप्तीच नित्यप्राप्ती आहे. ही नित्यप्राप्तीच मोदाचे कारण आहे. ही नित्यप्राप्ती घडवून देतात ते 'मुदगल'.

अनित्य प्राप्तीचा हव्यास कामासूर निर्माण करतो तर नित्यप्राप्तीच्या उपासनेने विकट प्रादुर्भाव होतो. श्रीहरी भस्मीभूत झालेल्या वृंदेच्या आसक्तीत कामातुर होतात आणि परिणाम होतो कामासूर प्रगटीकरणात. मग तो सगळ्या विश्वाचे हाल करतो. त्या कामास तेच नियंत्रित करू शकतात जे 'विकट' असतात.

सकल अनित्य बाबी या मायेच्या क्षेत्रात मोडतात. तीच अनित्य आहे. तिचा विषयच अनित्य आहे. तिची प्राप्तीही अनित्यच अत: तिच्या परिणामातून नित्यत्वाची संभावनाच नाही. ती 'कट' पूर्णच आहे. तिचा विलय ज्या परब्रह्माठायी होतो त्यांना श्रीविकट म्हणतात.

नमो श्री विकट विनायकाय! जय गणेश!

श्री ढुंढिराज मास माहात्म्य!

भारतीय कालगणनेकरीता दोन पद्धतींचा उपयोग केला जातो. एकास सौरमास म्हणतात तर दुसरीस चांद्रमास असे म्हणतात. या दोन गणनांमध्ये प्रतिवर्षी सुमारे १३ दिवसांचा फरक पडत जातो. त्यामुळे सुमारे तीन वर्षांनी अशी एक परिस्थिती येते की एका चांद्रमासाच्या काळात सूर्याचे राश्यांतर घडतच नाही. अशा या चांद्रमासास ज्योतिष शास्त्राच्या परिभाषेत अधिकमास असे म्हणतात.

संपूर्ण चांद्रमासात सूर्याचे एकाच राशीत स्थिर असणे या गोष्टीचा स्थिरतेशी संलग्न रुपात विचार करीत या काळातील सगळ्याच सत्कर्मांना स्थैर्य लाभते या भूमिकेतून हा काळ धर्मशास्त्राने व्रतकाल रुपात महत्वाचा मानला आहे.

सध्याच्या काळाच्या विष्णूप्रधान स्वरूपानुसार सर्वच यास 'पुरुषोत्तम मास' असे म्हणतात. या काळात विष्णुस्मरण पुजन रूप विविध पवित्रकार्यांस सर्वच प्राधान्य दिलेले पहावयास मिळते.

गाणपत्य सांप्रदायाच्या भूमिकेतून या महिन्यास 'श्रीढुंढिराज मास' म्हणण्याची पद्धत आहे. भगवान श्री गणेशांच्या ढुंढिराज स्वरूपाची उपासना या काळात विशेष साधन रुपात वर्णिली आहे.

भगवान श्रीगणेशांचा फारसा परिचित नसलेला अवतार आहे श्रीढुंढिराज अवतार श्रीमुदगल पुराणात या अवताराची कथा विस्तृत रुपात आली आहे. या कथेचा गोषवारा पुढील स्वरुपात पाहता येईल.

कधीकाळी या देशात दिवोदास  नामक राजे होऊन गेले. महाराज दिवोदासास राज्य करण्याचा कंटाळा आला म्हणून ते संन्यास घेऊन तपाचरणात रत झाले. पुण्यवान राजा निघून गेल्याने राज्यात पापाचरणाचा प्रभाव वाढला आणि परिणाम रुपात अनावृष्टीचे संकट सातत्यपूर्ण रीतीने जगाला छळू लागले. सातत्याच्या दुष्काळाने जनता हवालदिल झाली आणि त्यांच्या आर्त हाकेने श्रीब्रह्मदेवही व्याकूळ झाले.

तपस्यारत दिवोदासासमोर येऊन त्यांस पुनश्च राज्य स्वीकारण्याची आज्ञा केली. दिवोदासांनी जगपित्याच्या आज्ञेचा तर मान राखला पण अट घातली की माझ्या राज्यात देवतांचा हस्तक्षेप चालणार नाही. त्यांची पूजा अर्चा सुरु राहील पण अधिकार माझाच असेल. श्रीब्रह्मदेवांजवळ होकाराशिवाय पर्याय नव्हता.

दिवोदास पुन्हा राज्य करण्यास सिद्ध झाले. पण त्यांची राजधानी होती महानगरी काशी आणि काशीत अधिकार चालतो श्रीविश्र्वनाथांचा. आता ब्रह्मदेवांना श्री शंकरांना काशी बाहेर काढणे भाग होते. शेवटी त्यांनी वेगळाच उपाय योजला. विन्ध्यपर्वतावर तपस्यारत मरिचि नामक ऋषींना मोक्षप्रदान करण्याच्या निमित्ताने श्री शंकरांना तेथे नेले आणि मग तेथे सर्व घटनाक्रम सांगून येथेच राहण्याची विनंती केली. श्री शंकरांचा नाईलाज झाला.

मात्र काशीचा विरह काशीश्र्वरांना सहन होईना. त्यांनी सगळ्या देवतांचे स्मरण केले. देवांनी वेगळाच मुद्दा मांडला. आमचा अधिकारच नसेल तर आम्ही दिवोदास राज्यात कार्यच कशाला करायचे? असे म्हणत एकेक देवता गुप्त झाली. अग्नीने प्रज्वलित होणे सोडले, जलाने, वायुने वाहने बंद केले.

देवतांना वाटले दिवादोस शरण येईल. पण घडले भलतेच. तपोबलयुक्त राजा दिवादोस स्वत:च सगळ्या रुपात नटला.

काय पंचाईत झाली हे पाहण्यासाठी श्रीशंकरांनी एकेका देवतेला काशीत पाठवले. पण आपल्यावाचून काहीच अडत नाही हे पाहिलेल्या त्यांचीच पंचाईत झाली आणि आता परत जाऊन श्रीशंकरांना काय तोंड दाखविणार? म्हणत त्या देवता तिथेच रमल्या. प्रत्येकाच्या अशा जाण्याने श्रीशंकर अधिकच विचलित होत गेले.

सगळयाच देवता गेल्या आणि ख-या अर्थाने एकटया पडलेल्या श्रीशंकरांना अंतिमपर्याय रुपात आठवले 'श्रीगणराज चरण'.

श्रीशंकरांनी कळवळून श्रीगणराज प्रार्थना केली. मी काशीचा निर्माता, मी काशीचा स्वामी, मी काशीचा अधिकारी या सगळया भ्रमाचा निरास झालेल्या श्रीशंकरांच्या निर्मल चित्तात श्रीचिंतामणी प्रगट झाले. मग समोरही प्रत्यक्ष रुपात प्रगट झाले.

श्रीशंकरांनी पूजन स्तवन केले आणि काशीवासार्थ प्रार्थना केली. तथास्तु म्हणत भगवान गुप्त झाले.

श्रीशंकरांच्या या कार्यार्थ भगवान श्री गणेशांनी श्रीढुंढिराज अवतार धारण केला. आरंभी ब्राह्मणरूप घेऊन श्रीढुंढिराज काशीनगरीत आले आणि त्यांनी ज्योतिष विद्येचा आधार घेत सकल जणांना आकृष्ट केले. शेवटी त्यांच्या प्रचंड लोकप्रियतेचा विचार करीत राजास त्यांची दाखल घेणे भाग पडले. त्यांना राजदरबारी पाचारण करण्यात आले. महाराज दिवोदासांच्या आदरातिथ्याचा, पूजनाचा स्वीकार करून भगवान श्रीगणेशांनी त्यांना श्रीविश्वेश्वराचे पुनरागमन, राज्य त्यागाचा आदेश देत दिवोदासांना मुक्ती प्रदान केली. श्रीविश्वनाथांनी काशीत परतताच प्रथम कार्य केले ते श्रीढुंढिराजांची स्थापना. आज हे स्थान आपणास श्रीविश्वनाथ मंदिराच्या पश्चिम प्रवेशद्वाराजवळच दिसते. श्रीढुंढिराज गणेशांना  वंदन केल्यावरच माझ्या दर्शन फलाची प्राप्ती होईल असा नियम श्री विश्वनाथांनीच त्यावेळी घोषित केला.

ज्योतिषशास्त्राच्या आधारे जनतेला आकृष्ट करणारा हा अवतार असल्याने गाणपत्य साम्प्रदायानुसार ज्योतिषशास्त्राची देवता रुपात श्रीढुंढिराजांना वंदन केले जाते. त्या ज्योतिष कालगणनेचा भाग असल्याने या अधिकमासास श्रीढुंढिराज मास म्हटले जाते.

काशीनगरीतून प्रसंग वशात दुरावलेल्या आणि परिणामत: दु:खी झालेल्या श्री शंकरांच्या दु:ख नाशार्थ आणि पुनरपि सुस्थापने करिता झालेल्या या अवताराच्या उपासनेने आपलीही सकल दु:खे दूर होऊन अखंड आनंद भुवन काशीत आपलीही निवास भूमी निश्चित व्हावी आणि तेथूनच आपली स्वानंद लोकाची वाटचाल प्रशस्त व्हावी यासाठी या काळात श्रीढुंढिराज उपासना अधिक फलदायी वर्णिली आहे.

अशा श्रीढुंढिराज मासाच्या सगळयांना हार्दिक शुभकामना

जय गजानन!                    जय गणेश!